**उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कार स्पर्धा योजना**
**स्वरुप, अटी/शर्ती, निवडीचे निकष व कार्यपध्दती**
**विहित करण्यास शासन मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१४/प्र.क्र.२१३/३४

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मुंबई-४०० ०३२.

तारीख: १ ऑगस्ट,२०१४

वाचा-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. बीएपी-२००१/प्र.क्र.९४/२००१/३४, दिनांक ८ नोव्हेंबर, २००१

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीएपी-२००२/३४०/३४,दिनांक १९ मार्च, २००२

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीएपी-२००२/३४०/३४, दिनांक ९ फेब्रुवारी, २००४

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीएपी-२००५/३५५/प्र.क्र.५९/३४, दिनांक २६ जुलै,२००५

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीएपी-२००६/७३०/प्र.क्र.१२८/२००६/३४, दिनांक ९ मार्च, २००७

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीएपी-२००८/४२८/प्र.क्र.३५/३४,दिनांक ६ मे, २००८

७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. जीगौपु २१०८/५०१/प्र.क्र.५१/३४,दिनांक २७ जून, २००८

८) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीएपी २०१०/प्र.क्र.६०/३४,दिनांक १ जून,२०१०

९) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीएपी २०११/प्र.क्र.८१/३४, दिनांक २३ फेब्रुवारी, २०११

१०) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीएपी २०११/प्र.क्र.८३/३४,दिनांक ७ मार्च, २०११

११) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. संकीर्ण २०११/प्र.क्र.४०७/३४,दिनांक ३ जानेवारी, २०१२

प्रस्तावना -

शासनाच्या प्रगतीची, विकासाची माहिती सामान्य जनतेपर्यंत पोहोचविण्याची गरज आहे. त्यासाठी विविध विकास योजना, त्यांची अंमलबजावणी व या अंमलबजावणीच्या प्रक्रीयेतील लोकांचा सहभाग जनतेपर्यंत पोहोचविणे व त्याद्वारे संबंधितांना प्रोत्साहन देण्यासाठी प्रसार माध्यमांची भूमिका अतिशय महत्त्वाची आणि परिणामकारक ठरत असल्यामुळे, पुरस्कारांच्या माध्यमातून अशा चांगल्या प्रयत्नांना प्रोत्साहित करणे आवश्यक ठरले आहे. विकास विषयक बातम्या, वार्तापत्रे, स्फूट लेखन यांना वृत्तपत्रांतून अधिक वाव मिळावा या उद्देशाने

राज्य शासनातर्फे सन १९८५ पासून दरवर्षी विकास वार्ता पारितोषिक स्पर्धा योजना सन १९९३ पर्यंत आयोजित करण्यात येत होती. नंतर सन २००१ पासून उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कार योजना नव्या स्वरुपात पुन्हा सुरु करण्यात आली. सन २००३ या वर्षापासून इलेक्ट्रॉनिक मीडियातील व्यक्तींनाही पुरस्कार देण्यात येत आहेत.

सन २००६ पासून ज्येष्ठ संपादक, ज्येष्ठ पत्रकार यांना लोकमान्य टिळक जीवनगौरव पुरस्कार देऊन गौरविण्यात येत असून, तोलाराम कुकरेजा उत्कृष्ट वृत्तपत्र छायाचित्रकार व माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील शासकीय गटातील छायाचित्रकारांसाठी केकी मूस उत्कृष्ट छायाचित्रकार पुरस्कार देण्यात येत आहेत. लोकमान्य टिळक जीवनगौरव पत्रकारिता पुरस्कार निवडीसाठी संदर्भाधीन दिनांक २७ जून, २००८ च्या शासन निर्णयान्वये मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली आहे. उर्वरित उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कार प्रवेशिका मागवून देण्यात येतात व या पुरस्कारांच्या निवडीसाठी शासन स्तरावर वेळोवेळी समिती नियुक्त करण्यात येते. लोकमान्य टिळक जीवनगौरव पत्रकारिता पुरस्काराची रक्कम संदर्भाधीन दिनांक ७ मार्च, २०११ च्या शासन निर्णयान्वये रुपये १,००,०००/- (रुपये एक लक्ष फक्त) इतकी वाढविण्यात आलेली आहे. तसेच राज्य शासनामार्फत देण्यात येणाऱ्या उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्काराच्या रकमेत संदर्भाधीन दिनांक ३ जानेवारी, २०१२ च्या शासन निर्णयान्वये परिशिष्ट अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे वाढ करण्यात आलेली आहे. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने आतापर्यंत वेळोवेळी वृत्तपत्रात/शासनाच्या संकेतस्थळावर उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कारांसाठी योजनेचे स्वरुप, नियम, अटी/शर्ती, निवडीचे निकष, कार्यपध्दती जाहीर करुन प्रवेशिका मागविल्या होत्या व शासनाने नियुक्त केलेल्या परीक्षण समित्यांनी विजेत्यांची निवड केलेली आहे.

उपरोक्त सर्व पुरस्कारांसाठी सामाईक उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कार स्पर्धा योजना, स्वरुप, नियम, अटी/शर्ती, निवडीचे निकष व कार्यपध्दती विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कार स्पर्धा योजनेचे स्वरुप, नियम व अटी पुढीलप्रमाणे विहीत करण्यास या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) वृत्तपत्रे आणि इलेक्ट्रॉनिक्स माध्यमातील पत्रकारांना द्यावयाच्या पुरस्कारांना 'राज्यस्तरीय उत्कृष्ट पत्रकारिता पुरस्कार असे संबोधले जाईल. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील

अधिकारी/कर्मचाऱ्यांना देण्यात येणाऱ्या राज्यस्तरीय पुरस्काराला ‘राज्यस्तरीय उत्कृष्ट लेखन पुरस्कार असे संबोधिले जाईल.

२) या स्पर्धेतर्गत महाराष्ट्र तसेच महाराष्ट्राबाहेरील गोवा, बेळगाव, दिल्ली येथे प्रकाशित होणाऱ्या मराठी, हिंदी, इंग्रजी व उर्दू या भाषेतील दैनिके, साप्ताहिके व पाक्षिकातील लिखाणाचा विचार केला जाईल. स्पर्धेत पुढीलप्रमाणे गट असतील. १) पत्रकार २) इलेक्ट्रॉनिक मीडिया ३) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील अधिकारी व कर्मचारी ४) वृत्तपत्र छायाचित्रकार ५)छायाचित्रकार (शासकीय गट, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय)

३) दरवर्षी पुरस्कारासाठी त्या वर्षातील १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधीत प्रसिध्द झालेले महाराष्ट्र शासनाच्या विविध लोकोपयोगी योजनांवर आधारित लेख, अग्रलेख, वृत्तमालिका, यशकथा, लाभार्थींच्या मुलाखती (दूरदर्शन व आकाशवाणीवरील कार्यक्रम) अशा स्वरुपाचे लिखाण ग्राह्य मानण्यात येईल, मात्र हे लिखाण मूळ स्वरुपात असावे, भाषांतरीत नसावे.

४) पुरस्कारांसाठी पत्रकारांची मागील पाच वर्षांची कामगिरी, त्यांची सामाजिक बांधिलकी, शासनाच्या विकास विषयक कामांच्या प्रसिध्दीसाठी जनतेमधील विकास विषयक जाणिवांच्या जागृतीसाठी त्यांनी केलेले प्रयत्न आणि पुरस्कार देण्यात येणाऱ्या वर्षातील त्यांची कामगिरी याचा विचार केला जाईल.

५) मराठी, इंग्रजी, हिंदी आणि उर्दू भाषेतील राज्य/विभागीय पुरस्कारांसाठी निवड याच पध्दतीने केली जाईल. तसेच सलग दोन वर्ष एकाच पत्रकाराला पुरस्कार प्राप्त झाल्यास तिसऱ्या वर्षी त्यांची प्रवेशिका विचारात घेतली जाणार नाही.

६) या स्पर्धेत फक्त मराठी भाषेसाठी राज्य व विभागीय स्तर आहेत. इंग्रजी, हिंदी, उर्दू या भाषेतील पुरस्कार केवळ राज्यस्तरीय आहेत.

७) पुरस्कारासाठी निवड झाल्यास पुरस्कार स्वीकारण्याची तयारी असल्याचे संबंधित पत्रकाराचे संमतीपत्र प्रवेशिकेसोबत जोडणे आवश्यक आहे.

८) पुरस्कारासाठी पाठवावयाच्या प्रवेशिकेसोबत मूळ लिखाणाची कात्रणे त्याच्या दोन प्रतींसह पाठवावी लागतील. मूळ लिखाणाच्या वृत्तपत्रीय कात्रणांसोबत त्याच्या दोन प्रती नसल्यास प्रवेशिका रद्द होईल. मूळ लिखाणावर लेखकाचे नाव नसल्यास, ज्या नियतकालिकात हा लेख प्रसिध्द झाला

असेल त्या नियतकालिकाच्या संपादकांचा दाखला प्रवेशिकेबरोबर जोडलेला असावा, अन्यथा त्या प्रवेशिकेचा विचार केला जाणार नाही.

९) पत्रकारांच्या तसेच वृत्तपत्र छायाचित्रकारांच्या गटात भाग घेणाऱ्या स्पर्धकांनी शासन अथवा शासकीय महामंडळाच्या सेवेत नसल्याचे प्रतिज्ञापत्र प्रवेशिकेसोबत जोडणे आवश्यक आहे.

१०) अर्जदारांनी राज्य व विभागीय पातळीवरील प्रवेशिका नागपूर आणि औरंगाबाद येथील संचालक (माहिती), अमरावती, नाशिक, पुणे, कोल्हापूर, कोकण विभाग येथील विभागीय उपसंचालक (माहिती) किंवा जिल्हा माहिती अधिकारी यांच्याकडे थेट पाठवाव्यात. प्रवेशिकेसोबत जिल्हा माहिती अधिकारी किंवा पत्रकार संघटनांच्या शिफारसपत्राची आवश्यकता नाही.

११) मराठी, हिंदी, इंग्रजी, उर्दू , तसेच वृत्तपत्र छायाचित्रकार, छायाचित्रकार शासकीय गट (माहिती व जनसंपर्क महासंचालनालय) या राज्यस्तरीय पुरस्कारासाठी आणि विभागीय पातळीवरील मराठी भाषेतील पुरस्कारासाठी विजेत्यांची निवड करण्याकरिता शासनातर्फे वेळोवेळी समिती नियुक्त करण्यात येईल. या समितीमध्ये शासकीय सदस्य (१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय-अध्यक्ष (२) संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क)-सदस्य सचिव हे राहतील. आणि मराठी भाषेसाठी ५, इंग्रजी, हिंदी, उर्दू इलेक्टॉनिक मीडिया यासाठी प्रत्येकी १ याप्रमाणे अशासकीय सदस्य शासनाकडून वेळोवेळी नियुक्त करण्यात येतील. समितीची रचना, स्पर्धा व स्पर्धेतील पुरस्कारांसबंधी शासनाचे निर्णय अंतिम राहतील.

१२) ज्या नियतकालिकांचा खप व जनमानसावरील प्रभाव चांगला आहे, अशाच नियतकालिकांतील मजकूर स्पर्धेच्या प्रवेशिकेसाठी पात्र ठरेल.

१३) जे पत्रकार/वृत्तपत्र छायाचित्रकार बृहन्मुंबई, नवी मुंबई (कोकण), कोल्हापूर, नागपूर, अमरावती, नाशिक, पुणे आणि औरंगाबाद या विभागात वास्तव्य करीत असतील त्यांना त्या विभागासाठी असलेल्या विभागीय स्पर्धेतच भाग घेता येईल. यासाठी त्यांचे लेखन/छायाचित्र कोणत्याही विभागातील वृत्तपत्रात प्रसिध्द झाले असले तरी ते ग्राह्य मानण्यात येईल.

१४) गोवा व बेळगाव येथील पत्रकारांना/वृत्तपत्र छायाचित्रकारांना कोल्हापूर विभागीय स्पर्धेत (सिंधुदूर्ग आणि सांगली जिल्ह्यांसह) भाग घेता येईल. दिल्ली येथील वृत्तपत्र छायाचित्रकारांना/

पत्रकारांनाही आपल्या प्रवेशिका थेट किंवा महाराष्ट्र परिचय केंद्रामार्फत माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई येथे पाठविता येतील.

१५) शासकीय गटातील स्पर्धेसाठी उत्कृष्ट लेखन / उत्कृष्ट छायाचित्रकार असे दोन पुरस्कार असून या करिता प्रवेशिका संबंधित विभागाच्या संचालक (माहिती) किंवा उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय यांना व बृहन्मुंबईच्या प्रवेशिका माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई येथे वेगवेगळ्या पाठवाव्या लागतील.

१६) या स्पर्धेविषयीची माहिती आणि अर्जांचे नमुने दरवर्षी जानेवारी महिन्यात वृत्तपत्रांमधून तसेच महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत उपलब्ध करुन देण्यात येतील. तसेच जिल्हा माहिती अधिकारी, उपसंचालक (माहिती) विभागीय माहिती कार्यालय, संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, नागपूर-अमरावती विभाग , नागपूर / मराठवाडा विभाग, औरंगाबाद, महाराष्ट्र परिचय केंद्र, पणजी-गोवा /नवी दिल्ली तसेच माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई येथे सदर माहिती व अर्जांचे नमुने उपलब्ध करुन देण्यात येतील.

१७) ज्या कॅलेंडर वर्षाकरिता प्रवेशिका असेल त्या कॅलेंडर वर्षातील दैनिक वृत्तपत्रात/नियतकालिकात प्रसिध्द झालेल्या लेखांची कात्रणे प्रवेशिकेसोबत जोडणे आवश्यक राहील.

१८) प्रवेशिकेवर राज्यस्तर/विभागीयस्तर तसेच प्रवेशिका कोणत्या भाषेकरिता आहे, याचा स्पष्ट उल्लेख करणे आवश्यक राहील. स्पर्धेसाठी पाठविलेली प्रवेशिका, त्यासोबत जोडलेली लेखांची कात्रणे नीटनेटकी असणे आवश्यक राहील. अस्ताव्यस्त, खाडाखोड असणारी किंवा वाचता येणार नाहीत अशा प्रवेशिका रद्द समजण्यात येतील.

१९) प्रवेशिका पाठवावयाच्या लिफाफ्यावर ज्या कॅलेंडर वर्षासाठी प्रवेशिका असेल त्या वर्षाचा उल्लेख तसेच प्रवेशिका राज्यस्तरासाठी किंवा विभागीय स्तरासाठी आहे व कोणत्या भाषेकरिता आहे याबाबतचा स्पष्ट उल्लेख असावा.

२०) प्रत्येक गटासाठी व भाषेसाठी संबंधित पत्रकारांनी एकच प्रवेशिका पाठवावी. एकापेक्षा अधिक प्रवेशिका पाठविल्यास त्यांचा विचार केला जाणार नाही. तसेच राज्यस्तर मराठी भाषेकरिता पाठविलेली प्रवेशिका विभागीय स्तरासाठी ग्राह्य ठरणार नाही.

२१) इलेक्ट्रॉनिक मीडियातील पत्रकारांकरिता उत्कृष्ट दूरचित्रवाणी वृत्तकथा पुरस्कारासाठी घेण्यात येणाऱ्या स्पर्धेच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे राहतील.

(१) ही स्पर्धा मराठी भाषेतील वृत्त कथेसाठी असेल.

(२) या स्पर्धेत दूरदर्शन, खासगी चित्रवाहिन्या, स्थानिक केबल न्यूज व शासकीय उपक्रम यांना सहभाग घेता येईल.

(३) वृत्तकथाचित्र हे स्पर्धेच्या संबंधित वर्षात तयार केलेले व प्रसारित झालेले असावे आणि वृत्तकथा किमान ३ मिनिटांची असावी.

(४) प्रवेशिका पाठविताना संबंधित प्रतिनिधीची माहिती तसेच वृत्तकथा कोणत्या दिवशी प्रसारित झाली याबाबतचे संबंधित संस्था प्रमुखांचे प्रमाणपत्र असावे.

(५) स्थानिक केबलच्या बाबतीत संबंधित जिल्हाधिकाऱ्यांचे नोंदणीपत्र सादर करणे आवश्यक राहील.

(६) प्रवेशिकेसोबत संबंधित वृत्तकथेची डिजिटल/बिटा कॅसेट थेट त्या त्या विभागातील उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय/जिल्हा माहिती अधिकारी यांच्याकडे तर मुंबईकरिता मा. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांच्याकडे पाठविण्यात यावी.

(७) मराठी वृत्तकथाचित्र राज्यस्तरीय पुरस्कारासाठी थेट प्राप्त झालेल्या नावांमधून पुरस्कारपात्र विजेत्यांची निवड करण्यासाठी इलेक्ट्रॉनिक मीडियातील तज्ज्ञ व्यक्तींची परीक्षण समितीवर नियुक्ती करण्यात येईल.

(८) वरिल अट क्र. ६ आणि अन्य संबंधित अटी इलेक्ट्रॉनिक मिडीयातील पत्रकारांसाठी असलेल्या उत्कृष्ट दूरचित्रवाणी वृत्तकथा पुरस्कारासाठी लागू राहतील.

२२) तोलाराम कुकरेजा उत्कृष्ट वृत्तपत्र छायाचित्रकार पुरस्कार स्पर्धा ही मराठी, इंग्रजी, हिंदी, उर्दू भाषेतील वृत्तपत्रातील पूर्णवेळ छायाचित्रकारांसाठी राहील.

२३) केकी मूस उत्कृष्ट छायाचित्रकार पुरस्कार स्पर्धेसाठी पुढीलप्रमाणे अटी/शर्ती राहतील.

१) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामध्ये छायाचित्रकार अथवा छायाचित्रकाराला छायाचित्रणाच्या कामांमध्ये सहाय्य करणारा कर्मचारी या स्पर्धेमध्ये भाग घेऊ शकतील.

२) उत्कृष्ट छायाचित्रकार स्पर्धा मराठी, इंग्रजी, हिंदी, उर्दू, भाषेतील दैनिकांमध्ये प्रसिध्द झालेल्या छायाचित्रांकरिता राहील.

३) दरवर्षीच्या पुरस्कारासाठी त्या वर्षातील १ जानेवारी ते ३१ डिसेंबर या कालावधीत प्रसिध्द झालेल्या महाराष्ट्र शासनाच्या विविध लोकोपयोगी योजनांवरील छायाचित्रे ग्राह्य ठरतील. मात्र हे छायाचित्र मूळ स्वरुपातील असावे, फोटोप्रत नसावी.

४) पुरस्कारांसाठी छायाचित्रकारांची मागील ५ वर्षांची कामगिरी, त्यांची सामाजिक बांधिलकी, शासनाच्या विकास विषयक कामाच्या प्रसिध्दीसाठी जनतेमधील जाणिवांच्या जागृतीसाठी त्यांनी केलेले प्रयत्न आणि पुरस्कार देण्यात येणाऱ्या वर्षातील त्यांची कामगिरी याचा विचार केला जाईल.

५) एकाच छायाचित्रकाराला सलग दोन वर्षे पुरस्कार प्राप्त झाल्यास तिसऱ्या वर्षी त्याची प्रवेशिका विचारात घेतली जाणार नाहीत.

६) पुरस्कारासाठी पाठवावयाच्या प्रवेशिकेसोबत ४ मूळ छायाचित्रे पाठविण्यात यावीत. ज्या नियतकालिकात छायाचित्र प्रसिध्द झाले असेल, त्या नियतकालिकांच्या संपादकांचा दाखला, तारीख, नियतकालिकाचे नाव प्रवेशिकेसोबत जोडलेले असावे. अन्यथा त्या प्रवेशिकेचा विचार केला जाणार नाही.

२४) प्रवेशिका निवडीसंबंधी किंवा त्या अनुषंगाने निर्माण होणाऱ्या अडचणी/समस्या इत्यादींसंबंधी महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांचा निर्णय अंतिम असेल.

२५) या शासन निर्णयातील उपरोक्त तरतूदी व अटी/शर्ती या पूर्वलक्षी प्रभावाने दिनांक १ जानेवारी, २००१ पासून लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०११२३२०२४१०७असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Mahadeo Jakhate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakhate
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kishor Mahadeo Jakhate
Date: 2014.08.01 12:33:07 +05'30'

**(कि.म.जकाते)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

२) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,

३) मा. राज्यमंत्री (मा.व ज.), यांचे खासगी सचिव,

४) सचिव (मा. व ज.) यांचे स्वीय सहायक

५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

६) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), मुंबई

७) अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

९) संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१०) संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

११) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१२) निवडनस्ती कार्यासन-३४

## परिशिष्ट –"अ"

| अ.क्र. | स्तर | पुरस्काराचे नांव | स्वरुप |
|---|---|---|---|
| १ | राज्यस्तरीय (मराठी) | लोकमान्य टिळक जीवनगौरव पत्रकारिता पुरस्कार | रु. १,००,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| २ | राज्यस्तरीय (मराठी) | आचार्य बाळशास्त्री जांभेकर पुरस्कार | रु. ५१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| ३ | राज्यस्तरीय (इंग्रजी) | अनंत गोपाळ शेवडे पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| ४ | राज्यस्तरीय (हिंदी) | बाबूराव विष्णू पराडकर पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| ५ | राज्यस्तरीय (ऊर्दू) | मौलाना अबुल कलाम आझाद पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| ६ | राज्यस्तरीय (मराठी) (माहिती व जनसंपर्क) शासकीय गट | यशवंतराव चव्हाण पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| ७ | राज्यस्तर उत्कृष्ट दूरचित्रवाणी वृत्तकथा | पु.ल.देशपांडे, उत्कृष्ट दूरचित्रवाणी वृत्तकथा पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| ८ | राज्यस्तर उत्कृष्ट वृत्तपत्र छायाचित्रकार पुरस्कार | तोलाराम कुकरेजा उत्कृष्ट वृत्तपत्र छायाचित्रकार पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| ९ | राज्यस्तर शासकीय गट (माहिती व जनसंपर्क) | केकी मूस उत्कृष्ट छायाचित्रकार पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| १० | विभागीय नाशिक विभाग | दादासाहेब पोतनीस पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र (अधिक रु. १०,०००/- दै.गावकरी, नाशिक यांचेकडून पुरस्कृत केले जातात.) |

| | | | |
|---|---|---|---|
| ११ | विभागीय- औरंगाबाद विभाग (लातूरसह) | अनंतराव भालेराव पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| १२ | विभागीय -मुंबई विभाग | आचार्य अत्रे पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| १३ | विभागीय- पुणे विभाग | नानासाहेब परुळेकर पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| १४ | विभागीय- कोकण विभाग | शि.म.परांजपे पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| १५ | विभागीय- कोल्हापूर विभाग | ग.गो.जाधव पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| १६ | विभागीय- अमरावती विभाग | लोकनायक बापूजी अणे पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |
| १७ | विभागीय- नागपूर विभाग | ग.त्र्यं.माडखोलकर पुरस्कार | रु. ४१,०००/- मानचिन्ह व प्रशस्तीपत्र |